**अथर्व सहकारी गृहनिर्माण संस्था (म.), श्रीगोंदा, ता. श्रीगोंदा जिल्हा अहमदनगर या संस्थेचा भूखंडावरील जादा क्षेत्र (प्लॉट क्र. ७२, ८२ व ११०) गहाणमुक्त करण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**

**शासन निर्णय क्र.घबांक-१९१८/प्र.क्र१८६८/१९-स**

न्यु इंडीया अॅश्युरन्स बिल्डिंग, ३ रा मजला,

महात्मा गांधी मार्ग ,बँक ऑफ इंडीयासमोर मुंबई ४०० ००१

दिनांक:- २१ जानेवारी, २०१९

**संदर्भ -:** १) शासन निर्णय क्रमांक एचएसजी-१९.०४/ प्र.क्र२३७/पहिला/१८-स दिनांक २७/१०/२००४, दि. २५/०७/२००५, दि. १६/०६/२००६, दि. ०५/०२/२००७, दि. ०६/०९/२००७, व दि. २७/०९/२००७

२) शासन निर्णय क्र.एचएसजी १०६७/XXIV/ ६ १९डिसेंबर ६७

३) संस्थेचा प्रस्ताव दिनांक ०२/०५/२०१७

**प्रस्तावना :-**

अथर्व सहकारी गृहनिर्माण संस्था (म.) श्रीगोंदा ता. श्रीगोंदा जिल्हा अहमदनगर या संस्थेचा गृहबांधणी कर्जाचा प्रस्ताव मंजूर करून शासनाने एकुण ५७ पात्र सभासदांना संदर्भ क्र.१ येथील एकुण सात शासन निर्णयान्वये वाढीव कर्जासह एकूण कर्ज रु.१,४२,०७,२५०/- ( रु. एक कोटी बेचाळीस लाख सात हजार दोनशे पन्नास फक्त) इतके कर्ज वितरीत करण्यात आले होते. योजनेच्या अटी व शर्तीनुसार कर्जाच्या पहील्या हप्त्यांचे प्रदान झाल्यानंतर संस्थेने, त्यांच्या मालकीची सर्व जमीन व त्यावरील बांधकाम केलेल्या सदनिका कर्जाची संपूर्ण परतफेड होईपर्यंत शासनाकडे गहाण ठेवल्या आहेत.

संस्थेच्या मुळ प्रस्तावानुसार एकूण ५७ सभासदांकरीता संस्थेचे एकूण क्षेत्र ४,२१४.९१ चौ.मी इतके आहे व त्यावर संस्थेचे एकूण ६० भुखंड उपलब्ध आहेत. संस्थेने ५७ सभासदांचा कर्ज मागणीचा प्रस्ताव शासनास सादर केला होता या सर्व सभासदांना कर्ज वितरीत करण्यात आले आहे. त्यामुळे संस्थेने ५७ सभासदांकरीता ४,०१९ चौ.मी क्षेत्रावर बांधकाम केलेले आहे. उर्वरीत १९५ चौ. मी क्षेत्र बांधकाम विरहीत आहे. बांधकाम विरहीत क्षेत्रावर भविष्यात कर्ज मंजूर होण्याची शक्यता नसल्याने शिल्लक क्षेत्र गहाणखतातून मुक्त करून हस्तांतरण/विक्री करण्यास परवानगी देण्याबाबत संस्थेने केलेल्या विंनतीचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, जिल्हा अहमदनगर यांच्या दिनांक १८/०३/२०१६ चा अहवालानुसार भुखंड क्रमांक ७२, ८२ व ११० या क्षेत्रावर बांधकाम झालेले नसल्याने ते क्षेत्र गहाणखतातून वगळण्यास हरकत नसल्याबाबत प्रमाणित केले असून शासन त्याबाबत खालीलप्रमाणे निर्णय देत आहे.

**शासन निर्णय :-**

अथर्व सहकारी गृहनिर्माण संस्था (मर्या.), श्रीगोंदा जिल्हा अहमदनगर या संस्थेने दिनांक २०/०१/२००५ रोजी महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावे नोंदवलेल्या गहाणखतातील संस्थेच्या गट नं ९४२ मधील हिस्सा नं. १/३ आणि २, प्लॉट नं. ६६ ते प्लॉट नं. ११५ मधील एकूण क्षेत्र ४,२१४.९१ चौ.मी भुखंडापैकी प्लॉट नं. ७२ (७२.०० चौ.मी), प्लॉट क्र. ८२ (५७.०० चौ.मी) व प्लॉट क्र.११० (६६.०० चौ.मी) एकूण १९५ चौ.मी एवढे क्षेत्र गहाणमुक्त करण्यास शासन मान्यता देत आहे.

सदरचे आदेश शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक एचएसजी-१०६७/XXIV, दिनांक ०६/१२/१९६७ परिच्छेद ११ मधील तरतूदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२९१५४००९६९०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,**

ASHOK SHANKAR BHUJBAL

Digitally signed by ASHOK SHANKAR BHUJBAL
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=d0603fd89ef561b0b051d6283b2c15bb82dcdd5e5dfe04798b8f19ffa9581722, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=fdb9a467c1125b3a23797088f3433a330c41502619eaa43bd29e751716ff3946, ou=CO OPERATION TEXTILE AND MARKETING DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ASHOK SHANKAR BHUJBAL
Date: 2019.01.29 16:10:08 +05'30'

**(अ.शं.भुजबळ)**
**कक्ष अधिकारी ,महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखापरीक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता) (२ प्रती).

२) महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखापरीक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता) (२ प्रती).

३) सहकार आयुक्त व निबधक, सहकारी संस्था, पुणे.

४) जिल्हाधिकारी, अहमदनगर.

५) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था अहमदनगर.

६) जिल्हा विशेष लेखापरिक्षक (वर्ग-१), सहकारी संस्था, अहमदनगर

७) अध्यक्ष / सचिव, अथर्व गृहनिर्माण संस्था मर्या., श्रीगोंदा ता. श्रीगोंदा जिल्हा अहमदनगर

८) निवडनस्ती १९-स